ई-साहित्य प्रकाशन

२८.०८.२००९
अंक : ३८

# छत्रीत चिंब झाले..



संपादक –

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

अतिथी संपादक –

श्वेता देशमुख ( ठाणे )

सहसंपादक –

सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
अहं ब्रम्हास्मि ( पुणे )
सचिन काकडे ( मुंबई )
सारंग भणगे ( पुणे )

## ह्या अंकात वाचा..

# संपादकीय

छत्री आणि छत्र ह्या दोन शब्दांचं नातं मोठं गहिरं आहे.आधाराचं,मायेचं,कृपेचं छत्र आपल्या डोक्यावर कायम रहावं असं साहजिकच सर्वांना वाटतं पण छत्री मात्र डोक्यावरुन उडून गेली तर..
हं,आता ते तुम्ही छत्रीत एकटेच होतात की कुणाबरोबर होतात त्यावर अवलंबून असतं..

लहानपणी जेव्हा पावसाशी ओळख होते तेव्हाच छत्री बरोबरही होते.पुरुषांसाठीची ठरलेली नीरस अशा काळ्या रंगाची छत्री तर स्त्रियांना मात्र विविधरंगी,नक्षीदार छत्रींचे विविध पर्याय असतात.त्यामुळेच कदाचित स्त्रियांचं नातं छत्रीसोबत जास्त जिवाभावाचं असतं.ते अधिक मजबूत होतं,तारुण्यात.

कित्येक प्रेमकहाण्या ह्या छत्रीच्या आडोशात सुरु होतात तर डोळ्यांतून ओघळणाऱ्या पावसात कित्येक वाहूनही जातात.बाकी राहतात आठवणी....अन छत्रीच्या तुटलेल्या काड्यांप्रमाणेच हृदयाच्या एखाद्या तारेवर लोंबत राहतात.

छत्री असूनही आपण ओलेचिंब का ?
हे गुपित कधीच जगाला कळत नाही..
अन भर पावसात भिजत असूनही कोरडे का ?
हेही..

पण,हे देखील तितकंच खरंय की,तुमच्याजवळ छत्री असेल तर तिच्यात येण्यापासून कुणास मज्जाव करण्यात हासिल ?आणि कुणी तुम्हाला छत्रीचं छत्र देऊ पहात असेल तर नकार देण्यात शहाणपणा ?

...हुशार....

लक्षणं नव्हती
पण,
सर आली होती
तो हुशार..
त्याने छत्री आणली
ती वेंधळी..
त्याच्या छत्रीत भिजली होती

- स्वप्ना

आभाळमाया कोसळत असतांना , एका छत्रीत एका दिशेने वाटचाल करणारी पावले आणि एकमेकांना भिजावे लागू नये म्हणून अधिक समीप येण्याची आंतरिक उर्मी ही निसर्गाचीच किमया आणि समजूतदार सहजीवनाची किल्ली सुध्दा !

छत्री जुनी होते,मोडते तेव्हा आपण ती अडगळीत टाकून देतो अन एक पावसाळा त्या छत्रीत निमूटपणे अश्रू ढाळत राहतो.ह्याचा तुम्ही कधी विचार केलाय ?

माणसाच्या आयुष्यात त्याची परीक्षा घेणारा ऋतु म्हणजे पावसाळा.अशात त्या निळ्या छत्रीवाल्याचे कृपाछत्र आपणा सर्वांवर कायम रहावं हीच सदिच्छा.

....छत्रीत चिंब झाले....

घननीळ थेंब
अवचित आले
ओघळले स्पर्श
देह सुकुमार
छत्रीत चिंब झाले

- स्वप्ना

- स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
संपादक

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन अंक वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास पाठवण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या ईमेल चा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

# कवींची छत्री



....छत्रीच्या काड्या तुटल्यावर केलेली कविता....

अचानक पापणी वर जावी
तशी बटन दाबताच तुझी छत्री उघडते
अन तू दिसेनाशी होतेस

दिसत राहतो
तुझा वाऱ्याशी चाललेला झगडा
आणि
या झगड्यात
'चान्स' घेणारा पाऊस

- टल्ली ( गुजरात )

....बेवफा....

पाऊसही आलाच होता की परवा..तोही पहिला
तरी तुझी आठवण आल्यावरच ती सुचली..बेवफा कविता

मी थांबले होते खुप वेळ..बोचरे थेंब झेलत
तरी तुझी आठवण आल्यावरच त्याने भिजवलं..बेवफा पाऊस

तू नसतांना काय भिजायचं..म्हणून उघडली खरं
तरी तुझी आठवण आल्यावरच उडून उलटलीच..बेवफा छत्री

उशीरापर्यंत एकटं कशाला भटकायचं..म्हणून थांबवली
तरी तुझी आठवण आल्यावरच सवयीने निसटलीच..बेवफा बस

थांबले,भिजले,रमलेही..तुझ्या आठवणीत बस स्टॉपवरच
तरी घरची आठवण होताच निघाले रे..बेवफा मीच !

- अनुश्री वर्तक ( मुंबई )

तुझ्या शिरावर परवा ज्याने धरली होती छत्री,मीच तो होतो,जाता जाता तुझे चोरले मन ज्याने,होता हरी,मी तो नव्हतो..

- अरविंद चौधरी ( जळगाव )



## ....काही पावसाळे....

आज ही छत्री उघडली
अन काय काय बरसले

काही रेनकोट
मोठे मोठे होत जाणारे

काही छत्र्या
रंगीबेरंगी आकारा-प्रकाराच्या

काही सरी
हळूवार,जोरदार

काही तुषार
झेललेले न झेललेले

काही पावसाळे
ओले सुके

- स्वाती फडणीस ( मुंबई )

## ....भर पावसात....

भर पावसात
एकाच छत्रीखाली
ते दोघं !

डोक्यावर छत्री असूनही..
चिंब भिजलेले

आणि मी..

धो धो पावसात
अखंड भिजत..

छत्री नसूनही

कोरडाच !

- प्रतिक खिसमतराव ( मुंबई )

ठाऊक आहे मला,तुला माझी काळजी आहे.कुणाच्या न कुणाच्या रुपाने छत्री धरत माझ्या भवती आहेस.
म्हणूनच पावसात भिजायची मज्जा आहे

- श्वेता देशमुख ( ठाणे )



## ....छत्रीखालचं बालपण....

मुसळधार पावसात
खिडकीसमोर बसून
आठवणींचे कण गोळा करतांना
हमखास सापडणारा एक कण
म्हणजे आपलं छत्रीखालचं बालपण

पावसाळयात रोज सकाळी
शाळेत जायची इच्छा नसतांनाही
आजोबांची जड काळी छत्री घेऊन
चिखलातून वाट काढत जात
छोट्या रंगीबेरंगी छत्र्यांमध्ये मिसळणारं
आपलं बुजलेलं बालपण

दप्तराच्या ओझ्यासोबत
छत्रीची वेगळी पिशवी वागवणारं
आणि वर्गाबाहेर ठेवल्यामुळे
वेंधळयासारखी छत्री विसरल्यावर
आईचा मार खायला लावणारं
आपलं भिजलेलं बालपण

खुप पाऊस पडल्याने
शाळेला सुट्टी मिळाली
तर लपाछपी खेळतांना
तीच काळी छत्री उघडून
त्यामागे बिनधास्त लपणारं
आपलं खट्याळ बालपण

- नितीन मुळे ( पुणे )

## ....छत्री गं छत्री....

छत्री गं छत्री
किती करशी गंमती
मज भिजवण्यास
तुझी पावसाशी गट्टी

छत्री गं छत्री
का गं अशी वागतेस ?
वाऱ्याशी संगनमत करुन
तू का उलटतेस ?

छत्री गं छत्री
का न तू उघडशी ?
बटण दाबून दाबून
बोटं माझी दुखती

छत्री गं छत्री
हो गं बाई बंद तू
बंद करण्या तुला
किती करु करामती ?

छत्री गं छत्री
कशीही असलीस
तरी मज प्रिय तू
प्रियासवे क्षण प्रितीचे देशी तू

- श्वेता देशमुख ( ठाणे )

पाऊस म्हणजे रिपरिप bear करणं,पाऊस म्हणजे तुझं नि माझं छत्री share करणं

- रविकिरण देशपांडे ( पुणे )



## ....आता आम्ही दोघेही भिजतो आहोत....

ऑफिसवरुन घरी निघायची वेळ
सगळेच अगदी घाईला टेकलेले आणि
अचानक पाऊस बरसू लागला
त्याचे दिवसच आहेत म्हणजे तो बरसणारच,पण असा अचानक ?

इतक्यात ती दिसली..

आणि वीज कडाडली,त्या क्षणभराच्या प्रकाशात जणू परीच भासली
पाऊस तिच्या गालांवर अगदी थैमान घालत होता
ती मात्र त्याला साधा विरोधही करु शकत नव्हती
क्षणभर माझाही जळफळाट झाला

तिने माझ्याकडे पाहिलं
आणि पुन्हा एक वीज कडाडली
पण आभाळात नाही,ह्रदयात
ती जवळ आली

मी छत्रीत होतो,पण काय करु सुचेना
एक मन म्हणतंय,तिला छत्रीत घ्यावं
आणि दुसरं ओरडतंय,तिच्यासोबत भिजावं
ती मात्र असंच एक प्रश्नचिन्हं चेहऱ्यावर घेऊन अजून भिजतेच आहे

अखेर वाराच पडला मध्ये
आणि माझ्या हातची छत्री हिसकावून घेऊन गेला
आता आम्ही दोघेही भिजतो आहोत
ती पावसात आणि मी तिच्या भिजणाऱ्या रुपात

- संतोष बडगुजर ( पुणे )

## ....कालचा पाऊस....

कालचा पाऊस काही और होता
सोबतीला ती,ग्रहांचा जोर होता

बॅगेत माझ्या छत्री,मनात मोर होता
तिच्या छत्रीत भिजण्याचा,कावा थोर होता

पावसाच्या थेंबातही चोर होता
सरींचा तिच्याच बाजूला जोर होता

भिजलेल्या बटांत घन घोर होता
काळजात इथे ठोक्यांचा शोर होता

गुलाबी गालांवर थेंब टपोर होता
छत्रीत एक चांद एक चकोर होता

कालचा पाऊस खरंच काही और होता
माझ्या हाती स्वर्गाचा जणू दोर होता

- दिलीप पेडणेकर ( बर्कशायर, यु.के. )

तुझी नि माझी एकच छत्री,पाऊस भिजवून करतो मैत्री

- महेश घाटपांडे ( मुंबई )

# स्वाती - नक्षत्रांचे देणे : अतिथी संपादकाच्या लेखणीतून



मी श्वेता चिन्मय देशमुख.तलावांच्या शहरात म्हणजे ठाण्यात राहते.एका आर सी सी कंसल्टंट कंपनीत काम करते.

ऑफिसचे काम करत असतांना एकेदिवशी सहजच, खरं तर चुकूनच ऑर्कुटवर आले.आणि तेथील कवितांच्या कम्युनिटीत रमले.त्या शब्दफुलांच्या बागेत विहरतांना मला अचानक आठवले की,महाविद्यालयात असतांना आपणही कविता लिहीत होतो.मग काय ? शब्दांची फुलपाखरं मनात भिरभिरायला लागली आणि मी पटकन जशी सुचली तशी एक कविता कम्युनिटीत पोस्ट करुन टाकली.तेव्हा मला मराठी फॉंटची माहिती नव्हती पण ‘नाम गुम जायेगा’ उर्फ नाम काका ह्यांनी माझी ती इंग्लिशमध्ये टाईप केलेली कविता मराठी फॉंटमध्ये करुन दिली.नंतर मग ऑर्कुटवर कविता,चारोळ्या लिहीणं हे नित्याचचं होऊन गेलं.मी पूर्वाश्रमीची स्वाती राणे त्यामुळे ‘स्वाती’ ह्याच नावाने कविता लिहत असते.माझी आई आणि ताई देखील कविता लिहतात,त्यामुळे कविता माझ्या रक्तातच आहे.कविता माझी अभिव्यक्ती आहे.मनातला आनंद,बोचणारे सल,हळव्या आठवणी,आजुबाजूच्या घटनांची नोंद हे सारं माझ्या कवितेतून डोकावतं.

ह्या आवडीतूनच मग मी माझीही कवितांची एक कम्युनिटी सुरु केली.नवोदित कवींना प्रोत्साहन व मार्गदर्शन, प्रस्थापित कवींच्या कवितांचा संग्रह,त्यावर चर्चा असे अनेक उपक्रम ह्या कम्युनिटीत राबवले जातात. तसं मराठी साहित्यात माझी रुची खुप आधीपासूनच आहे. व.पु.काळे, अमृता प्रितम हे माझे आवडते लेखक तर ,बहिणाबाई आणि कुसुमाग्रज हे आवडते कवी.कथा,कादंबरी,काव्यसंग्रह वाचणं हा माझा छंदच पण सध्या मात्र माझी ‘गोजिरी’ लेक हीच माझा एकमेव छंद बनलेली आहे. ऑफिसमध्ये काम करतांना सतत रुक्ष शब्दांशीच संपर्क येत असतो पण खिडकीबाहेरचं वेडावणारं ऊन,खुणावणारा पाऊस,आकाशाची निळी सावली मनाला भुलावतात.कधीतरी दोस्तांबरोबर होणारे वाद-संवाद कवितेला नवीन विषय देतात अन नकळत सुंदर कविता जन्म घेते.अनेकदा जाणवतं की,कित्येकदा स्त्रियांना नोकरीत डावलण्यात येतं,संधी दिली जात नाही,ही ‘बाई’ काय करु शकते ?असा पूर्वग्रह ठेवून दुर्लक्ष केले जाते तेव्हा चीड येते अशा मानसिकतेची.तेही माझ्या कवितांतून मी मांडण्याचा प्रयत्न करत असते.

तर आता,ह्या धुंद कुंद करणाऱ्या पावसाबद्दल.पाऊस म्हटलं म्हणजे छत्री तर हवीच. छत्रीशी माझी गट्टी लहानपणापासूनची.आजही मला आठवते,माझी एक छोटुशी ठिपक्याठिपक्यांची छत्री होती.मैत्रिणींबरोबर खेळतांना पावसाच्या पाण्यात कागदी नावा सोडायच्या आणि एका हाताने छत्री सांभाळायची अशी कसरत मी करत असे.तसा छत्रीचा आणखीन एक उपयोग होता.भातुकलीच्या खेळात घर बनवायला.‘छत्री तू माझी मैत्रिण,तुझ्या गोष्टी मी सर्वांना सांगीन’असे मी म्हणत असे.वयाप्रमाणे मी आणि माझ्या छत्रीचं स्वरुप बदलत गेलं.‘कधी उन्हं तापलं म्हणून छत्री डोक्यावर,मला सावली देणारी..जसं आईच्या मायेची,त्या परब्रम्हाची सावली सदैव माझ्यावर’.पावसाळा आल्यावर छत्रीची खरेदी करायची म्हणजे माझी तारांबळ उडते.‘छत्रीचे किती प्रकार,किती रंग,तिला घेतांना मी नेहमीच होते दंग’.ही घेऊ की ती ? हिचा रंग सुंदर आहे तर तिच्यावरली नक्षी.हम्म,कुठली घेऊ ? तुमचंही असंच होत असेल ना ?आणि एकदाची छत्री खरेदी केली की नेमकी समोरच्या माणसाचीच छत्री आपल्या छत्रीपेक्षा जास्त छान आहे असे वाटायला लागते.महाविद्यालयात जातांना पावसात छत्री नेहमी सोबत असायची.पण,पर्समध्ये बंद.लेक्चर बुडवून भिजायला जायचं,छत्रीला पावसात भिजायला नाही मिळायचं.अशातच ‘तो’ भेटला.माझा जीवनसाथी.त्याला भेटल्यावर छत्रीही नव्या रुपाने भेटली.मला तर वाटतं,छत्री हा आयुष्यातला एक अविभाज्य घटकच आहे.मला अतिथी संपादकपदाचा बहुमान दिल्याबद्दल मी स्वप्ना आणि नेटाक्षरीची आभारी आहे.मराठी कविता जगाच्या कानाकोपऱ्यात पोहचवणाऱ्या नेटाक्षरीस माझ्या मनःपूर्वक शुभेच्छा.‘दे तुझा हात हाती,करु प्रगती,नेऊ मराठी,सर्वमुखी.’

....साक्षीदार....

रिमझिम पावसात मेघ गरजतांना
कुठे आडोश्याला उभे असतांना
एकाच छत्रीत तू अन मी
ते चोरटे स्पर्श हवेहवेसे
ती होणारी नजरानजर
अन हातात हात गुरफटलेले
ओले थेंब छत्रीतून ओघळणारे
ओंजळ माझी भरणारे
मोती बनून पुन्हा निथळणारे
तन्मन बहरलेले
प्रेमाच्या बरसातीत
आपल्या प्रेमाची साक्षीदार..माझी छत्री

- श्वेता देशमुख ( ठाणे )

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

netaksharee@gmail.com